श्रीमती कल्पना दिलीप ठाकुर (पूर्वाश्रमीचे कल्पना अंबरसिंग सुर्यवंशी) यांना अधिसंख्य पदावरुन नियमित सेवेत वर्ग करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः अधिसं-२०२१/प्र.क्र.२३८/आरोग्य ३अ**
गो.ते.रुग्णालय आवार, दहावा मजला, संकुल इमारत
मंत्रालय, मुंबई ४००००१
दिनांक : ०३ फेब्रुवारी २०२२

**वाचा :-**

१) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक. बीसीसी २०१८/प्र.क्र.३०८/१६-ब, दिनांक २१.१२.२०१९
२) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्रमांक.असंप-२०२०/प्र.क्र.२९/आरोग्य-३, दिनांक ३१.१२.२०२०
३) संचालक, आरोग्य सेवा, पुणे यांचे पत्र क्र. संआसे/आस्था/कक्ष-५५अ/न.क्र. २०८८०/२१ दिनांक १७.१२.२०२१

**प्रस्तावना :-**

सामान्य प्रशासन विभागाने उपरोक्त संदर्भाधीन अनुक्रमांक.१ येथील शासन निर्णयान्वये मा.सर्वोच्च न्यायालयाने सिव्हील अपील क्र.८९२८/२०१५ (चेअरमन आणि मॅनेजिंग डायरेक्टर, एफसीआय आणि इतर विरुध्द जगदिश बालाराम बहिरा व इतर) व इतर याचिका यामध्ये दिनांक ६/७/२०१७ रोजी मागास जातींना असलेल्या आरक्षणाच्या आधारे शासकीय सेवेत दाखल झालेल्या व त्यानंतर जातीचे दावे अवैध ठरलेल्या व्यक्तींना शासकीय सेवेत संरक्षण देय ठरत नाही या निर्णयाची अंमलबजावणी करण्यासाठी मा.उच्च न्यायालय, मुंबई, खंडपीठ नागपूर यांनी, रिट याचिका क्र.३१४०/२०१८ मध्ये दि.२८/९/२०१८ च्या आदेशान्वये मा.सर्वोच्च न्यायालयाच्या आदेशानुसार दि.३१/१२/२०१९ पर्यत कार्यवाही करण्याचे आदेश दिले असल्याने अशा कर्मचारी यांची अधिसंख्य पदे निर्माण करुन या अधिसंख्य पदावर कर्मचारी यांना वर्ग करण्याची कार्यवाही करण्याची सूचना दिली

होती. त्यास अनुसरुन उपरोक्त संदर्भाधीन अनुक्रमांक २ येथील दिनांक ३१.१२.२०२० च्या शासन निर्णयान्वये, अनुसुचित जमातीचे प्रमाणपत्र अवैध ठरलेले, अवैध ठरल्यानंतर विशेष मागास प्रवर्गाचे अथवा अन्य कोणत्याही मागास प्रवर्गाचे जात वैधता प्रमाणपत्र सादर केलेले, अनुसुचित जमातीचा दावा सोडून दिलेले, जात पडताळणी समितीकडे प्रस्ताव सादर न केलेले, जात पडताळणी समितीच्या निर्णया विरोधात मा.न्यायालयात याचिका दाखल केलेले मात्र मा.न्यायालयाने स्थगिती न दिलेले व जात वैधता प्रमाणपत्र अवैध ठरल्याने सेवा समाप्त केलेल्या गट-क व गट-ड या संवर्गातील कर्मचा-यांची एकूण २५७+२=२५९ इतकी अधिसंख्य पदे आरोग्य सेवा आयुक्तालयाच्या अधिनस्त कार्यालयांच्या आस्थापनेवर अधिसंख्य पदे निर्माण करण्यात आलेली होती. आता संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, पुणे यांनी उपरोक्त संदर्भाधीन अनुक्रमांक ३ येथील दिनांक १७.१२.२०२१ च्या पत्रामध्ये नमुद केले आहे की, श्रीमती कल्पना दिलीप ठाकुर (पूर्वाश्रमीचे कल्पना अंबरसिंग सुर्यवंशी) यांना शासकीय सेवेत दिनांक ३१.०१.१९९० रोजी कनिष्ठ लिपिक या पदावर अनुसूचित जमाती या प्रवर्गातून नियुक्ती देण्यात आली होती. परंतु त्यांनी सदर जातीचे जात वैधता प्रमाणपत्र सादर न केल्याने त्यांना अधिसंख्य पदावर वर्ग केलेले आहे. तसेच श्रीमती ठाकुर-सुर्यवंशी ह्या दि. ३१.०५.२०२० रोजी जिल्हा रुग्णालय, जळगांव येथून नियत वयोमानानुसार सेवानिवृत्त झालेल्या आहेत. जिल्हा शल्यचिकित्सक, जिल्हा रुग्णालय, जळगांव यांचे मार्फत जात वैधता प्रमाणपत्र तपासणी समिती, नंदूरबार यांना श्रीमती ठाकुर-सुर्यवंशी यांचे प्रमाणपत्र तपासणीकरीता पाठविण्यात आले होते. त्यानुसार जात वैधता प्रमाणपत्र तपासणी समिती, नंदूरबार यांचे प्रमाणपत्र क्र. १४१६२०, दिनांक २०.०८.२०२१ अन्वये श्रीमती ठाकुर-सुर्यवंशी यांचे अनुसूचित जमातीचे प्रमाणपत्र वैध ठरविले आहे. श्रीमती ठाकुर-सुर्यवंशी यांचे अनुसूचित जमातीचे जात प्रमाणपत्र वैध ठरल्याने अधिसंख्य पदांवरुन नाव वगळून त्यांना नियमित सेवेत वर्ग करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत पुढील प्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

श्रीमती कल्पना दिलीप ठाकुर (पूर्वाश्रमीचे कल्पना अंबरसिंग सुर्यवंशी) यांचे नावाने उपविभागीय अधिकारी, शिरपूर जि. धुळे यांनी दिनांक ३०.०१.२०२० रोजी निर्गमित केलेले अनुसूचित जमातीचे जात प्रमाणपत्र क्रमांक ३९५६१२२०८६२ व सदरील जात प्रमाणपत्र जात वैधता प्रमाणपत्र तपासणी समिती, नंदूरबार यांनी त्यांचे क्र.१४१६२०, दिनांक २०.०८.२०२१ च्या जात वैधता प्रमाणपत्रान्वये वैध ठरविल्याने असल्याने दिनांक ३१.१२.२०२० च्या शासन निर्णयातील अनुक्रमांक ११६ वरील अधिसंख्य पदांवरील नांव वगळून त्यांना नियमित पदावर वर्ग करण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०१२४१५०१५८८२१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Roshani Dinesh Kadam Patil

Digitally signed by Roshani Dinesh Kadam Patil
DN: CN = Roshani Dinesh Kadam Patil, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Public Health Department
Date: 2022.02.03 18:11:49 +05'30'

( रो. दि. कदम-पाटील)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. महालेखापाल, (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र- १/ २, मुंबई/ नागपूर.
२. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
३. संचालक (१), आरोग्य सेवा, मुंबई.
४. संचालक (२), आरोग्य सेवा, पुणे.
५. उपसंचालक, आरोग्य सेवा, नाशिक मंडळ, नाशिक
६. जिल्हा शल्य चिकित्सक, जळगांव
७. जिल्हा कोषागार अधिकारी, जळगांव
८. निवडनस्ती (आरोग्य-३ अ ).